अधिकृत आंतरराष्ट्रीय स्पर्धेत सहभागी होणाऱ्या होतकरु खेळाडूंना प्रशिक्षण व इतर बाबींसाठी आर्थिक सहाय्य देण्यासाठी निधी वितरणास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : क्रीडाधो-३२२२/प्र.क्र.१३३/क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १९ एप्रिल, २०२३.

वाचा:-

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र. क्रीडाधो ३११३/प्र.क्र.२९/क्रीयुसे-३, दि. २८/०४/२०१४
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र. क्रीडाधो ३२१७/प्र.क्र.१२२/क्रीयुसे-३, दि. ०७/१०/२०१७.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२/०४/२०२३
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.आंखेआस/शासनस्तरावर/प्रस्ताव /२०२२-२३/का-६/५०१७, दि. २३/११/२०२२.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील खेळाडूंनी आंतरराष्ट्रीय स्तरावर दर्जेदार कामगिरी करुन पदक विजेते खेळाडू तयार व्हावेत तसेच राज्यातील खेळाडूंना अधिकृत आंतरराष्ट्रीय स्पर्धेत भाग घेण्यासाठी प्रोत्साहन मिळावे व अत्युत्कृष्ट कामगिरी करण्याकरिता आवश्यक असलेले तज्ञ क्रीडा प्रशिक्षकांचे मार्गदर्शन, स्पर्धापूर्व प्रशिक्षण, प्रवास खर्च, उपकरणे-क्रीडा साहित्य, इ. उपलब्ध करता यावेत यासाठी आर्थिक सहाय्य करण्याची योजना संदर्भ क्र.(१) येथील शासन निर्णय, दि. २८ एप्रिल, २०१४ अन्वये लागू केली आहे. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीसाठी रु. ०३.०० कोटी इतक्या निधीची अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. त्याअन्वये संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये आर्थिक सहाय्य करण्यासाठी कु. गौरी सोळंके "तलवारबाजी" या खेळाडूस रू. १.४० लक्ष (अक्षरी रूपये एक लक्ष चाळीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता राज्यातील खेळाडूंना अधिकृत आंतरराष्ट्रीय स्पर्धेत भाग घेऊन अत्युत्कृष्ट कामगिरी करण्याकरिता प्रोत्साहन मिळावे. तसेच, अत्युत्कृष्ट कामगिरी करण्याकरिता आवश्यक असलेले तज्ञ क्रीडा प्रशिक्षकांचे मार्गदर्शन, स्पर्धापूर्व प्रशिक्षण, प्रवास खर्च, उपकरणे-क्रीडा साहित्य, इत्यादी बाबी विचारात घेऊन कु. गौरी सोळंके "तलवारबाजी" या खेळाडूस रू. १.४० लक्ष ( अक्षरी रुपये एक लक्ष चाळीस हजार फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरीता होणारा खर्च मागणी क्रमांक : ई-३, "२२०४ क्रीडा व युवक सेवा-१०४ क्रीडा व खेळ पंचवार्षिक योजनांतर्गत योजेना (०८)खेळ व खेळाडूंना सहाय (०३) आंतरराष्ट्रीय खेळाडूंना प्रशिक्षण, क्रीडा साहित्य, मार्गदर्शकाचे शुल्क इत्यादींसाठी आर्थिक सहाय्य (२२०४ ५६५३) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. १२/०४/२०२३ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१९१५५११७९३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2023.04.19 15:58:02 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
८. संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
९. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. वरिष्ठ कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, पुणे.
११. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. निवडनस्ती, क्रीयुसे-३.